




# महाराष्ट्र लोकसेवा आयोग

## MAHARASHTRA PUBLIC SERVICE COMMISSION

बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा मजला, महात्मा गांधी मार्ग, हुतात्मा चौक, मुंबई ४००००१ ☎ २२६७ ०२१० /१४८ /२४८,२२१०२२२२ फॅक्स : २२६७३९१५

Bank of India Bldg, 3rd floor, Mahatma Gandhi Road, Hutatma Chowk, Mumbai 400001 ☎ 2267 0210 /148 /248, 22102222 Fax : 22673915

**ई-मेल** - sec.mpsc@maharashtra.gov.in **वेबसाईट** - www.mpsc.gov.in

**जाहिरात क्रमांक** : आयोगामार्फ त शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील **उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदे, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट - ब** (**प्रशासकीय शाखा**) पदावरील सरळसेवा भरतीसाठी ऑनलाईन पद्धतीने अर्ज मागिवण्यात येत आहेत. या पदासाठी प्रस्तुत जाहिरातीमध्ये नमूद के लेली अर्हता, अटी व शर्तीची पूर्तता करणारे उमेदवार अर्ज करू शकतात.

**३. वेतनश्रेणी**- रु ९,३०० - ३४,८०० + ग्रेड पे रु. ४,८००/- , **एकूण वित्तलब्धी अंदाजित रु**. २८,०००/-.

**४. पात्रता** :-

**४.१** भारतीय नागिरक.

**४.२ वय**:- (**कमाल ३३** वर्षे, मागासवर्गीयांसाठी **३८** वर्षे.

(२) अगोदरपासून शासकीय सेवेत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा **५** वर्षापर्यन्त शिथिल. **तथापि, मागासवर्गीय उमेदवार आणि शासकीय कर्मचारी आणि खेळाडू यांना असलेली वयोमर्यादेतील शिथीलतेची सवलत यापैकी कोणतीही अधिकतम असलेली एकच सवलत देय राहील**.

(३) शासन आदेशानुसार माजी सैनिक, अपंग व खेळाडू इत्यादीसाठी वयोमर्यादा शिथिलक्षम राहील.

**४.३ शैक्षणिक अर्हता** :- (१) सांविधानिक विद्यापीठाची कोणत्याही शाखेतील प्रथम श्रेणीतील पदवी किंवा शासनाने त्यास समतुल्य म्हणून जाहिर केलेली अर्हता.

(२) मराठी भाषा अस्खलीतपणे वाचता, लिहिता व बोलता येणे आवश्यक.

५. प्रस्तुत जाहिरातीमध्ये नमूद केलेली शैक्षणिक अर्हता किमान असून, किमान अर्हता धारण केली म्हणून उमेदवार मुलाखतीस बोलाविण्याकरिता पात्र असणार नाही. जाहिरातीस अनुसरून प्राप्त झालेल्या अर्जाची संख्या वाजवी प्रमाणापेक्षा जास्त असेल आणि अर्ज सादर केलेल्या सर्व उमेदवारांच्या मुलाखती घेणे सोईस्कर नसल्यास मुलाखतीसाठी उमेदवारांची संख्या मर्यादित करण्याच्या दृष्टीने जाहिरातीत दिलेल्या शैक्षणिक अर्हतेपेक्षा जादा शैक्षणिक अर्हतेच्या आधारे निकष निश्चित करून अथवा चाळणी परीक्षेद्वारे मुलाखतीस पात्र उमेदवारांची संख्या मर्यादित करण्यात येईल. चाळणी परीक्षा घेण्याचे निश्चित झाल्यास, अर्हता शिथिल केली जाणार नाही. चाळणी परिक्षेचा अभ्यासक्रम, परीक्षेचे माध्यम व इतर बाबी आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात येतील. प्रस्तुत जाहिरातीमध्ये भरतीसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज करण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क,निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशीलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवरील सरळसेवा भरती अंतर्गत 'उमेदवारांना सर्वसाधारण सूचना' मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व जाहिरात अधिकृत समजण्यात येईल.

**६. जे उमेदवार चुकीची माहिती सादर करतील त्यांना या व पुढील सर्व निवडीसाठी अपात्र ठरविण्यात येईल.**

**७. कर्तव्ये व जबाबदा-या**:- प्रस्तुत पदाच्या कर्तव्ये व जबाबदा-या याबाबतचा तपशील आयोगाच्या **www.mpsc.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

**८. शुल्क : १) अमागास - रु. २६०/- २) मागासवर्गीय - रु. १३५/-**

९.

९.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या www.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

९.४ विहित पद्धतीने आयोगास अर्ज सादर केल्यानंतर परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

९.५ आयोगाने निश्चित केलेले परीक्षा शुल्क खालील पद्धतीने भरता येईल :-
(१) भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे (२) नेटबँकिंग (३) डेबिट कार्ड. (४) क्रेडिट कार्ड. (५) संग्राम केंद्र / सीएससी (नागरिक सेवा केंद्र)

९.६ www.mahaonline.gov.in येथे संग्राम केंद्र (ग्रामपंचायतीमध्ये) आणि सीएससीची सूची उपलबध आहे.

९.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

(१) शुल्क भरण्याकरिता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील " माझे खाते " या लिंक वर क्लिक करावे.

(२) " माझे खाते " या लिंक वर क्लिक केल्यानंतर उमेदवाराने अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या / न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. ज्या पदासमोर 'Unpaid' असे लिहिलेले असेल, त्या ठिकाणी 'Pay Now' अशी लिंक उपलब्ध असेल.

(३) " Pay Now " या लिंक वर क्लिक केल्यानंतर 3 पर्याय उपलब्ध होतील. 1. ऑनलाईन पेमेंट 2. नागरी सुविधा केंद्र 3. चलानद्वारे

(४) उमेदवार क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन पेमेंट करु शकतील.

(५) नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. उपरोक्त कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

(६) उमेदवाराने चलनाद्वारे हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

(७) ज्या उमेदवारांना भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरावयाचे आहे असे उमेदवार अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर करणा-या उमेदवारांनी त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

१०. चाळणी परीक्षा घ्यावयाचे ठरल्यास सदर परीक्षेच्या अर्ज स्वीकारण्याच्या अंतिम दिनांकानंतर व परीक्षेपूर्वी ७ दिवस अगोदर उमेदवारास प्रवेशप्रमाणपत्र त्याच्या प्रोफाईलद्वारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत उमेदवाराने परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

११. परीक्षेच्या वेळी उमेदवाराने प्रवेशप्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.